**लाचलुचपत प्रतिबंधक विभागामार्फत झालेल्या कार्यवाहीनंतर सक्षम प्राधिकरणाने करावयाच्या कार्यवाहीबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**परिपत्रक, क्रमांक :- एमसीओ-२०२२/सं.क्र.५४८/नवि-१५**

नगर विकास विभाग, मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दि.१६.०३.२०२२.

**परिपत्रक**

लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९९८ अंतर्गत केलेल्या कार्यवाहीनंतर सक्षम प्राधिकाऱ्यांकडे, निलंबन व अभियोग पूर्वमंजूरी करिता प्रस्ताव प्राप्त होत असतात. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी सूचना दिल्या असून, यासंदर्भात अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सर्वंकष आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुर्नबांधित-१/११अ, दि.१२.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केले आहेत.

२. तथापि, राज्यातील काही महानगरपालिकांमध्ये लाचलुचपत प्रकरणी नुसत्या मागणीच्या आरोपावरून संबंधितांस निलंबित करू नये. मात्र ज्या कर्मचाऱ्याला लाच रक्कम स्वीकारतेवेळी रंगेहाथ पकडण्यात आले आहे त्यांना, महानगरपालिका सेवेतून निलंबित करण्यात यावे, असा धोरणात्मक निर्णय पुनर्विलोकन सभेमध्ये घेतला असल्याने, संबंधितांस निलंबित न केल्याचे व फक्त जनतेशी संपर्क येणार नाही अशा ठिकाणी त्यांची बदली केल्याचे निदर्शनास आले आहे. लाचेची मागणी सिध्द होणारे पुरावे प्राप्त झाले असल्यास, प्रकरणेपरत्वे निलंबित करण्याचा विचार करणे आवश्यक आहे.

३. सबब, भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम, १९८८ अंतर्गत केलेल्या कार्यवाहीबाबत प्रस्ताव प्राप्त झाल्यावर करावयाच्या कार्यवाहीबाबत सर्व महानगरपालिका, नगरपरिषदा व नगरपंचायतींना खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) अटक झाल्याचा कालावधी ४८ तासाहून अधिक असल्यास अटकेच्या दिनांकापासून मानीव निलंबनाचे आदेश काढणे अनिवार्य आहे. मानीव निलंबनाची प्रकरणे वगळून अन्य प्रकरणात प्रस्ताव प्राप्त झाल्यावर प्रथमतः, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१२.०३.१३ च्या परिच्छेद (९) क) मधील तरतूदीनुसार, लाचेचा सापळा प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर अपचारी अधिकारी/कर्मचारी यांना तात्काळ निलंबित करण्याची

कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्यांनी करावी. प्रकरणाचे गांभीर्य व पुराव्यांची सद्यस्थिती पाहून तात्काळ निलंबनाबाबत निर्णय घेण्यात यावा. केवळ अटक झालेली नाही, या कारणास्तव सरसकट सर्व प्रकरणी निलंबन नाकारण्यात येऊ नये. प्रत्येक प्रकरणात स्वतंत्रपणे निर्णय घेऊन तो शासनाचा नगर विकास विभाग व गृह विभागास माहितीस्तव कळविण्यात यावा. तसेच, निलंबनानंतर ९० दिवसाच्या कालावधीत विभागीय चौकशीची कार्यवाही सुरू करून दोषारोपपत्र बजावले जाईल याची दक्षता घ्यावी.

२) अभियोग पूर्व परवानगीची प्रकरणे प्राप्त झाल्यावर, त्याबाबतही प्रकरणातील पुराव्याची कागदपत्रे तपासून विहीत कालमर्यादेत आवश्यक कार्यवाही करून त्याबाबत प्राधिकृत अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने लाचलुचपत प्रतिबंधक विभागास व शासनास अभियोग मंजूरी/अभियोग मंजूरी नाकारल्याबाबत कळविण्यात यावे.

३) याशिवाय, मा.न्यायालयाने शिक्षा ठोठावलेल्या प्रकरणी संबंधिताविरुध्द बडतर्फीची वा तत्सम कार्यवाही करतांना, कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाविरूध्द वरिष्ठ न्यायालयात अपील केले असल्यास, बडतर्फीची वा अन्य कार्यवाही स्थगित केल्याचेही काही प्रकरणी निदर्शनास आले आहे. अशा प्रकरणी, अपीलीय न्यायालयाने जर अपराधसिद्धीस (Conviction) स्थगिती दिली असेल, तरच पुढील कार्यवाही स्थगित करावी. अन्यथा, फक्त शिक्षेच्या (Sentence) अंमलबजावणीस स्थगिती दिली असेल किंवा केवळ अपील दाखल झाले असेल तर, बडतर्फी वा तत्सम कार्यवाही त्वरित करण्यात यावी, ती थांबवू नये.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१६१७३०१२६३२५ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Satish Janardan Moghe

Digitally signed by Satish Janardan Moghe
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=111b70025a1881414fac76bc68bf343b3e02d30ebc4a47002f96a5814761fbb1, pseudonym=BA9BEB7BA17F2C3BE021FAD1E4B41AE0B62306CF, serialNumber=E7FDE1EB36D7F614EC7F3B9970FA793E6B745BCA70B672C62D914F3466A11B44, cn=Satish Janardan Moghe
Date: 2022.03.16 17:36:46 +05'30'

**( सतीश मोघे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई.
३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव.

५. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव,

६. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव,

७. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.

८. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव.

९. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव,

१०. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

११. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

१२.महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१३. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,

१४. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,

१५. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

१६. सचिव, महाराष्ट्र विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.

१७. सचिव, महाराष्ट्र विधान परिषद, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.

१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई

२०.सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व महानगरपालिका आयुक्त, मुख्याधिकारी सर्व नगरपरिषदा, नगरपंचायती

२१. नगरविकास विभागातील सर्व कार्यासने.

२२. निवड नस्ती (नवि-१५)